**सार्वजनिक बांधकाम विभागाच्या निविदा प्रक्रिये अंतर्गत निविदा तपासणी, स्विकृती, देयके अदा करणे व निविदा अंतिम झाल्यानंतर दोषदायित्व कालावधी व काम अंतिम करण्यापर्यंत अधिकारी/ कर्मचाऱ्यांच्या उत्तरदायित्वाबाबत सुधारित सूचना**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीएटी/२०१८/प्र क्र १२७/इमा-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २८ नोव्हेंबर, २०१८

<u>वाचा :</u> (१) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, क्रमांक : सीएटी/२०१७/प्र.क्र.८/इमा-२, दिनांक १२ एप्रिल, २०१७.
(२) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, क्रमांक : सीएटी/२०१७/प्र.क्र.८/इमा-२, दिनांक २७ सप्टेंबर, २०१८.

<u>प्रस्तावना :-</u>

सार्वजनिक बांधकाम विभागामध्ये रस्ते, पूल बांधकाम, परिरक्षण व दुरुस्ती तसेच इमारती बांधकाम परिरक्षण व दुरुस्तीच्या अनुषंगाने विविध प्रकारच्या निविदा मागविताना व सक्षम स्तरावर स्विकृती करुन कामे पूर्ण करण्याबाबत विविध सूचना यापूर्वी शासनाने संदर्भान्वये निर्गमित केलेल्या आहेत. सा.बां.विभागांतर्गत निश्चित करण्यात येणाऱ्या सर्व निविदांमध्ये निविदा सोबत कंत्राटदाराने केलेल्या कामाची देयके व मोजमापे तसेच देयके व अन्य पत्रव्यवहारात जोडलेली सर्व कागदपत्रे सत्य / खरी असल्याबाबतचे शपथपत्र जोडणे बंधनकारक केलेले आहे. या शपथपत्रानुसार निविदा सोबत तसेच देयका सोबत जोडलेली कागदपत्रे खोटी / बनावट निघाल्यास कंत्राटदार स्वत: जबाबदार असून सदर बाबतीत ते योग्य त्या कारवाईस पात्र असतात.

२. सा.बां.विभागांतर्गत काही ठिकाणी कार्यारंभ आदेशापूर्वी किंवा कार्यारंभ आदेश दिल्या नंतर कंत्राटदाराने निविदे सोबत जोडलेली काही कागदपत्रे खोटी असल्याची बाब निदर्शनास आलेली आहे. कंत्राटदाराने नोंदणीसाठी सादर केलेली कागदपत्रेही खोटी / बनावट असल्याचे निदर्शनास आले आहे. सा.बां. विभागाकडे असलेले मर्यादित मनुष्यबळ, असलेल्या कामाचा व्याप, ई-निविदेमुळे कंत्राटदारांमार्फत अपलोड केल्या जाणाऱ्या मोठया संख्येतील कागदपत्रे इत्यादी बाबींमुळे निविदेसोबत जोडलेल्या सर्वच कागदपत्रांची छाननी करुन सत्यता पडताळणी (Forensic तपासणी) करणे सा.बां.विभागाच्या अधिकाऱ्यांना शक्य होत नाही. तथापि, सदर बाबतीत क्षेत्रीय स्तरावरील अधिकाऱ्यांना विभागीय चौकशी तसेच भारतीय दंड विधानानुसार पोलिस कारवाईसाठी जबाबदार धरण्यात येत असल्याबाबतची बाब शासनाच्या निदर्शनास आलेली असून या अनुषंगाने या सर्व प्रकरणी शासन स्तरावरही विविध प्रकरणांच्या सखोल अभ्यासाअंती या सर्व बाबींचा सर्वंकष अभ्यास करुन खालील बाबींवर सविस्तर सूचना या शासन निर्णयाद्वारे प्रस्तृत करण्यात येत आहेत :-

(१) आता यापूढे रु.३ लक्ष आतील स्थानिक व रु.३ लक्ष वरील किंमतीच्या e (ई) निविदेसोबत जोडलेली (अपलोड केलेली) सर्व कागदपत्रे खरी असल्याबाबतचे प्रतिज्ञापत्र (परिशिष्ट-१) ५००/- रुपयाच्या स्टॅम्प पेपरवर लिफाफा क्र.१ मध्ये जोडणे कंत्राटदारास बंधनकारक करण्यात येत आहे. त्यानुसार निविदा कागदपत्रात आवश्यक बदल कार्यकारी / अधीक्षक / मुख्य अभियंता यांनी तात्काळ करावेत. निविदेतील लिफाफा क्र.१ मध्ये तसेच निविदा मंजुरी व नंतर देयके अदा करताना जोडलेली कागदपत्रे खोटी व बनावट असल्याची बाब निविदा उघडल्यानंतर निदर्शनास आल्यास **कंत्राटदार पूर्णपणे जबाबदार राहतील. सा.बां.विभागाचे अधिकारी जबाबदार असणार नाहीत** याबाबतचा स्पष्ट उल्लेख निविदेत करावा.

(२) निविदा लिफाफा क्र.१ उघडल्यानंतर कंत्राटदाराने निविदेसोबत जोडलेल्या कागदपत्रातील कोणतीही कागदपत्रे खोटी असल्याचे आढळून आल्यास संबंधित अभियंता यांनी लिफाफा क्र.२ न उघडता सदर कंत्राटदाराची निविदा अपात्र ठरवावी. संबंधीत कंत्राटदार नोंदणीकृत असल्यास त्यास काळ्या यादीत टाकणेची प्रक्रीया विहीत नियमानूसार कंत्राटदारास स्पष्टीकरण देण्याची संधी देणारी नोटीस देऊन व त्याचे स्पष्टीकरण विचारात घेऊन व तपासून त्यास अंतिमत: काळ्या यादीत टाकणेचा प्रस्ताव शासनास सादर करावा. कंत्राटदार नोंदणीकृत नसल्यास त्यास न्यायालयात Caveat दाखल करुन व कंत्राटदारास १५ दिवसाची नोटीस देऊन त्यावर कंत्राटदाराचे उत्तर प्राप्त करुन छाननीअंती कंत्राटदारास काळया यादीत टाकणे बाबतचा प्रस्ताव शासनास सादर करावा. ही बाब महाराष्ट्र शासनाच्या अन्य सर्व विभागांना तसेच शासनाच्या इतर उपक्रमांना कळविण्याची कार्यवाही त्वरीत करावी.

(३) **निविदा स्विकृती पुर्वी निविदेसोबत जोडलेल्या कागदपत्रात, कार्यारंभ आदेश स्तरावर व ते निर्गमित केल्यानंतर अथवा निविदा कालावधी, दोषदायित्व कालावधी व पत्रव्यवहार यात व देयक अदा करताना कोणतीही कागदपत्रे खोटी असल्याचे आढळून आल्यास संबंधित अभियंता यांनी भा.दं.वि.सं. अंतर्गत कंत्राटदाराविरुध्द फौजदारी गुन्हा दाखल करण्याची कार्यवाही तातडीने करावी.**

(४) शासनाने रु.१५० लक्ष रकमेपेक्षा जास्त रकमेच्या निविदांसाठी कंत्राटदाराच्या नोंदणीची अट काढून टाकलेली असल्यामुळे सदर बाबतीत निविदा सादर करणाऱ्या कंत्राटदार, व्यक्ती, भागीदारी संस्था, संस्था चालक, कंपनी व्यवस्थापक इ.विरुध्द संबंधित कार्यकारी अभियंता यांनी भा.दं.वि.सं. अंतर्गत कंत्राटदाराविरुध्द फौजदारी गुन्हा दाखल करण्याची कार्यवाही तातडीने करावी.

(५) सा.बां.विभागात निविदेसोबत जोडलेल्या बऱ्याचश्या कागदपत्रांची तपासणी महालेखापालांचे स्वतंत्र प्रतिनिधी म्हणून निविदा लिपीक, विभागीय लेखाधिकारी, उप कार्यकारी अभियंता तसेच कार्यकारी अभियंता यांचेकडून केली जाते. पूर्वी याबाबत नियमात स्पष्टता नव्हती, **आता या शासन निर्णयानूसार निविदेसोबत जोडलेल्या खोटया कागदपत्रांसंदर्भात संपूर्णपणे निविदा सादर करणारे कंत्राटदार जबाबदार राहतील. सार्वजनिक बांधकाम विभागाचे निविदा छाननी करणारे अधिकारी जबाबदार राहणार नाहीत.**

(६) निविदा स्विकृती कार्यकारी अभियंता, अधीक्षक अभियंता, मुख्य अभियंता तसेच शासन स्तरावरील विविध समित्या यांच्या स्तरावर केली जाते. निविदा स्विकृती नंतर कंत्राटदाराने सादर केलेली कागदपत्रे खोटी आढळल्यास त्यासाठी संबंधीत निविदा स्विकृत करणारे अधिकारी/समिती जबाबदार राहणार नाहीत. खोट्या / बनावट कागदपत्रांसाठी कंत्राटदार जबाबदार राहतील व त्यांचेवर भारतीय दंड विधान संहिते नुसार कार्यकारी अभियंता यांनी फौजदारी गुन्हा दाखल करावा.

(७) कार्यारंभ आदेश दिल्यानंतर कंत्राटदारांमार्फत सादर होणाऱ्या देयकांसोबत जोडण्यात आलेली कागदपत्रे खोटी आढळल्यास त्यासाठीही संबंधीत कंत्राटदार भारतीय दंड संहितेच्या विविध कलमा प्रमाणे कारवाईस पात्र राहतील, अशा निविदेतील कामे प्रारंभिक स्तरावर असल्यास निविदा रद्द करावी व कंत्राटदारास उपरोक्तप्रमाणे काळ्या यादीत टाकणेत येईल, अशी अट निविदेत समाविष्ट करण्यात यावी व सदर बाबतही वरीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

(८) निविदा अंतिम करताना व दोष दायित्व कालावधीत मुळ निविदा व त्या नंतरचा पत्रव्यवहार, कंत्राटदाराची देयके व त्यासोबतची साहित्य खरेदीची व अन्य बाबींची पुर्तता कागदपत्रे, चाचणी अहवाल इ. गुणवत्ता विषयक कागदपत्रे बनावट आढळल्यास त्यास कंत्राटदार संपुर्णत: जबाबदार राहिल. यासाठी सा.बां.विभागाचे अधिकारी / कर्मचारी तसेच विभागीय लेखाधिकारी जबाबदार असणार नाहीत.

(९) **या सुचना पूर्वलक्षी प्रभावाने लागू राहतील.**

३. या शासन निर्णयाचे काटेकोरपणे पालन होईल याची दक्षता सर्व संबंधित कार्यकारी अभियंता/ अधीक्षक अभियंता/ मुख्य अभियंता यांनी स्वत: जातीने लक्ष घालून घ्यावी व याबाबत परिशिष्ट-२ मध्ये नमूद केलेल्या विवरणपत्रात आर्थिक वर्ष संपल्यानंतर पुढील वर्षात मुख्य अभियंता यांनी १ एप्रिल ते १५ एप्रिल पर्यंत व जास्तीत जास्त उशीरा ३० एप्रिल पर्यंत वार्षिक अहवाल सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१८११२८१३२७०८८८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sachin Manikrao Chivate

Digitally signed by Sachin Manikrao Chivate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e51dff58ad80dfdae3976edee46d1bf7934d01469cb4d916976c25305666b613, serialNumber=40ae84322c80d3e4ea1b574eb3782ed6cb133b938933bdf197ed5a1551d8622a, cn=Sachin Manikrao Chivate
Date: 2018.11.28 13:35:01 +05'30'

**( सचिन चिवटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**सोबत** : (१) परिशिष्ट-१ - रु.५००/- च्या स्टॅम्प पेपर वर कंत्राटदाराने द्यावयाचा शपथपत्राचा नमूना मराठी व इंग्रजी
(२) परिशिष्ट-२

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई
२) मा.मंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.राज्यमंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
५) मंत्रालयीन सर्व विभागातील अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
६) अपर मुख्य सचिव (गृह विभाग)

यांना विनंती करण्यात येते की, सदरच्या शासन निर्णयातील सूचनांचे पालन करण्याबाबत आपल्या अधिपत्याखालील सर्व संबंधीतांना कळविण्यात यावे.

७) उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई.
८) महालेखापाल-१, मुंबई
९) महालेखापाल-२, नागपूर
१०) अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई/नागपूर
११) प्रत, महासंचालक, माहिती व प्रसिध्दी महासंचालनालय, मुंबई यांना प्रसिध्दीसाठी

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी,**

१) सर्व मुख्य अभियंते, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, (विद्युतसह)
२) मुख्य वास्तुशास्त्रज्ञ , सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई
३) संचालक, उद्याने व उपवने, मुंबई
४) सर्व अधीक्षक अभियंते, सार्वजनिक बांधकाम विभाग, (विद्युत / यांत्रिकी) / सर्व कार्यकारी अभियंते.
५) अधीक्षक अभियंता यांनी आपल्या अधिनस्त विभागातील कार्यालयांना सदर शासन निर्णयाची प्रत अग्रेषित करावी.
६) मुख्य अभियंता / अधीक्षक अभियंता, पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ, वरळी, मुंबई
७) सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, सा.बां.वि.,मंत्रालय, मुंबई
८) कार्यासन इमारती-२ (निवड नस्ती).

**परिशिष्ट -१**

**(१) मराठी**

**नमुना सत्यप्रतिज्ञापत्र** (रु.५००/- च्या स्टॅम्प पेपरवर)

## सत्यप्रतिज्ञापत्र (Affidavit)

मी ------------------------------------ वय वर्षे ---------------- राहणार ----------- या सत्यप्रतिज्ञा पत्राव्दारे लिहून देतो की, मी ------------------------------------ या फर्मचा/ कंपनीचा मालक असून ------------------------- या कामासाठी निविदा सादर करीत आहे. त्या निविदेच्या लिफाफा क्र.१ मध्ये जी कागदपत्रे सादर केली आहेत ती खरी, बरोबर व पूर्ण आहेत, त्यामध्ये कोणत्याही त्रुटी, चुका नाहीत, याची मी खात्री केलेली असून असे शपथपूर्वक खालील अटी व शर्थीसह मान्य करीत आहे. या कागदपत्रांमध्ये काही चुकीची , दिशाभूल करणारी, खोटी व तसेच अपूर्ण माहिती आढळल्यास मी भारतीय दंडसंहिता अंतर्गत कायदेशीर कार्यवाहीस पात्र राहीन.

१. जर कंत्राट कालावधीदरम्यान, मी, माझ्या कार्यालयाने किंवा माझ्या कर्मचा-यांनी सार्वजनिक बांधकाम विभागाला कोणतीही खोटी माहिती किंवा देयकासमवेत तसेच पत्रव्यवहारात खोटी / बनावट साहित्य खरेदीची कागदपत्रे सादर केली असल्यास, मी भारतीय दंडसंहिता अंतर्गत कायदेशीर कार्यवाहीस पात्र राहीन.

२. जर कंत्राट कालावधीदरम्यान आणि काम समाप्ती नंतर, अंतिम देयक देण्याच्या तारखेपर्यंत सादर केलेले कोणतेही कागदपत्रे खोटी / बनावट किंवा फसवी आढळल्यास, मी भारतीय दंडसंहिता अंतर्गत कायदेशीर कार्यवाहीस पात्र राहीन.

३. जर काम समाप्तीनंतर दोष दायित्व कालावधी दरम्यान किंवा त्यानंतर कोणत्याही वेळी, कोणतीही माहिती किंवा कागदपत्रे खोटी/बनावट, फसवी किंवा दिशाभूल करणारी आढळल्यास, मी भारतीय दंडसंहिता अंतर्गत कायदेशीर कार्यवाहीस पात्र राहीन.

**कंत्राटदाराची सही/शिक्का**

**(2) English**

**Affidavit ( on Rs.500/- Stamp Paper)**

I .................................................... age ...................................... address ........................................ (Authorized signatory to sign the contract), hereby submit, vide this affidavit in truth, that I am the owner of the contracting firm .................................... / authorized signatory and I am submitting the documents in envelope no.1 for the purpose of scrutiny of the contract. I hereby agree to the conditions mentioned below :-

1. I am liable for action under Indian Penal Code for submission of any false / fraudulent paper / information submitted in envelope no.1.
2. I am liable for action under Indian Penal Code if during contract period and defect liability period, any false information, false bill of purchases supporting proof of purchase, proof of testing submitted by my staff, subletting company or by myself, I will be liable for action under Indian Penal Code.
3. I am liable for action under Indian Penal Code if any paper are found false / fraudulent during contract period and even after the completion of contract ( finalisation of final bill ).

**(Signature of contractor)**
**(seal of company)**

## परिशिष्ट - २

### खोटी व बनावट कागदपत्रे सादर करणाऱ्या कंत्राटदारावर करण्यात आलेल्या कारवाईचा तपशील, प्रादेशिक विभाग ..........................

| अ.क्र | प्रादेशिक विभाग / जिल्हा / सा.बां.मंडळ | खोटी / बनावट कागदपत्रे सादर करणारे कंत्राटदार/ सु. बे. अ. कंत्राटदार / मजूर सहकारी कंत्राटदार संस्था / पूरवठा कंत्राटदारांचे नाव | प्रकरणांचा तपशील व बनावट कागदपत्रे आढळल्याचा दिनांक | कंत्राटदारावर गुन्हा दाखल केल्याचा दिनांक, गुन्ह्याचा तपशील FIR सह | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | |
| | एकत्रित एकूण | | | | |

स्वाक्षरी
(मुख्य अभियंता)

* आर्थिक वर्षात दाखल एकूण प्रकरणांपैकी दोष सिद्ध प्रकरणांची संख्या